अपर जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) या संवर्गातील अधिकाऱ्यांची बदलीने पदस्थापना...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. बदली-२०२३/प्र.क्र.१३३/ई-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ३० जून, २०२३.

संदर्भ:- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.
२) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९ /कार्या.१२, दि. १४.०७.२०२१.

**शासन आदेश :-**

संदर्भ क्र. २ येथील सामान्य प्रशासन विभागाच्या अधिसूचनेमधील नियम क्र.२(ग)(ग) अनुसार अतिरिक्त जिल्हाधिकारी व अतिरिक्त जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) या संवर्गास विभागीय संवर्ग वाटप नियम, २०२१ हे लागू होणार नाहीत असे स्पष्ट केले आहे.

सबब, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४)(एक) व ४ (५) मधील तरतुदींनुसार, अपर जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची त्यांच्या नावांसमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचे पदनाम | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री. अण्णासाहेब दादू चव्हाण | विशेष कार्य अधिकारी, अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय | अपर विभागीय आयुक्त ,विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे या रिक्त पदावर |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

३. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहीत केलेल्या तरतूदींनुसार, पदस्थापनेच्या ठिकाणी पदग्रहणाकरीता संबंधित अधिकारी यांना रविवार आणि सार्वजनिक सुट्या धरून **सात दिवसांचा कालावधी तयारीसाठी दिला जातो** व **त्याशिवाय, प्रत्यक्ष कालावधीची गणना** पुढीलप्रमाणे करण्यात येईल :-

**(ए) त्याच जिल्ह्यामध्ये किंवा लगतच्या जिल्ह्यामध्ये** (म्हणजेच, कोणत्यातरी ठिकाणी सामायिक हद्द असणारा जिल्हा) एखाद्या ठिकाणी बदली झाली असता प्रवासासाठी **एक दिवस**;

**(बी)** वरील खंड (ए) मध्ये उल्लेखिलेल्या ठिकाणाव्यतिरिक्त **अन्य ठिकाणी** बदली झाली असता प्रवासासाठी **दोन दिवस** एवढा पदग्रहण अवधी संबंधित अधिकाऱ्यास अनुज्ञेय राहील.

४. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहीत केलेल्या उक्त तरतूदींनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध शासन निर्णय, क्र.संकीर्ण २०१६/ प्र.क्र.१८६/ १६/ कार्यासन १४, दि. २३.१२.२०१६ मधील तरतूदींनुसार **शिस्तभंगविषयक कारवाई** करण्यात येईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. सदर आदेश निर्गमित केल्यानंतर, महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या **पदग्रहण अवधीतच**, बदली झालेल्या अधिकारी यांनी बदलीच्या ठिकाणी **रुजू** होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदग्रहण अवधीत बदलीच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा **अनुपस्थितीचा कालावधी हा “अकार्यदिन”** ***(dies non)*** **म्हणून गणला जाईल**, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जांची दखल घेण्यात येणार नाही.

७. सदरहू बदली आदेशांनुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामूळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६३०१४०५०१४३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MADHAV VITTHAL VEER

Digitally signed by MADHAV VITTHAL VEER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b8bcafe4a890e79ceaf1ea38b990e1e22edaeda6d9d0b7d64088adc780cd25e6, pseudonym=4E57EDEAE5DAA20669F89F9C4044778534189610, serialNumber=3C0E93AB894790967228875F0B4FD8C2FDA8590B77AE2EA700BF19E91A673AFC, cn=MADHAV VITTHAL VEER
Date: 2023.06.30 15:02:54 +05'30'

**(डॉ. माधव वीर)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,** विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा. उप मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. उपसभापती, महाराष्ट्र विधान परिषद, मुंबई
४. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. अपर मुख्य सचिव, (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. मा. अपर मुख्य सचिव (महसुल), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

८. सर्व विभागीय आयुक्त, महाराष्ट्र राज्य.
९. सह सचिव/अवर सचिव/का.अ., (का.१०/९/९-अ), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१-मुंबई
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१२. अधिदान लेखा अधिकारी/निवासी लेखा अधिकारी, मुंबई
१३. संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
१४. श्री. अण्णासाहेब दादू चव्हाण, अपर जिल्हाधिकारी (निवडश्रेणी)
१५. उपसचिव/अवर सचिव (आस्थापना), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१६. सर्व सह सचिव/उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१७. निवडनस्ती-कार्यासन ई-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

-*-*-*-